

| | |
|---|---|
| ई पुस्तक | "शंभूराजे" |
| प्रकाशक | ई साहित्य प्रतिष्ठान<br>छ. संभांजी महाराजांची ३५५ वी जयंती |
| ई आवृत्ती | १४ मे २०१२ |
| लेखक | श्री. दामोदर मगदूम, कोल्हापूर |
| संकल्पना आणि संकलन | सचिन काकडे ,मुंबई |
| मुखपृष्ठ | अमृता ढगे , अंबरनाथ |

esahity@gmail.com

# ।।अर्पणपत्रिका।।

“शंभूराजे” हे ई-पुस्तक नृपशंभूंच्या कवी मनाला अर्पण



esahity@gmail.com

# दोन शब्द. . .

श्री शंभोः शिवजातस्य, मुद्रा द्यौरिव राजते ।
यदंकसेविनो लेखा, वर्तते कस्य नोपरि ।।

छत्रपती शिवाजी राजे यांचे पुत्र श्री. संभाजी राजे यांची मुद्रा आकाशाप्रमाणे शोभत आहे. तिचे अंकसेवन करणा-यांचा (आधार घेणा-यांचा) पगडा सगळ्यांवर पडेल.

छत्रपती संभाजीराजे, ज्यांचे वर्णन सिंहाचा छावा म्हणुन शोभते. आठ भाषांचा जाणकार असणारा हा महाराजा, ज्यांनी ‘बुधभुषणम’ हा संस्कृत तर ‘नायिकाभेद’ ‘नखशिख’ ‘सातसतक’ हे ब्रजभाषेतील तीन ग्रंथ लिहिले. हा थोर राजा जसा लेखणीतही श्रेष्ठ होता तसा तो रणांगणात श्रेष्ठ होता. बुध्दिमता आणि शौर्य श्री शंभूराजामध्ये भरले होते. आपल्या ९ वर्षाच्या कारकिर्दीत त्यांनी स्वराज्याचा विस्तार दुप्पट केला, स्वराज्यातील एकही किल्ला गमावला नाही. मराठ्यांचे आरमार शक्तीशाली केले. कर्नाटकातील मराठी राज्य वाढविले, पोर्तुगीजांचे तीन चतुर्थांश राज्य जिंकले, औरंगजेबाच्या सैन्याची दाणादाण उडविली, असा हा छावा . छत्रपती संभाजीराजे एकाच वेळी मोघल, इंग्रज , पोर्तुगीज, सिद्धिशी लढत होते.

श्री शंभूराजांचे निष्कलंक व्यक्तीत्व समजण्यासाठी, शंभूराजानी लिहिलेला खालील श्लोक पुरेसा आहे.
(बुधभूषणम, अध्याय दोन, श्लोक ४२२ ) यात त्यांनी राजाचे सात दोष वर्णिलेल आहेत.

व्यसनादि च सर्वाणि भूपतिः परिवर्जयेत ।
सप्तदोषा सदा राज्ञा हातच्या व्यसनोदयाः ।।४२२।।

हे सात दोष पुढीलप्रमाणे आहेत, वादण्ड, पारुष्य, दुरयातंच , पान, स्त्री, मृगया आणि दयुत, शंभूराजे यांनी राजांना या सात दोषापासून दूर रहावयास सांगितले आहे.

श्री शंभूराजांनी बुधभूषण या आपल्या संस्कृत ग्रंथात पानापानावर असे विचार मांडलेत त्याकाळी राजाकडे जनानखाना असणे प्रतिष्ठेचे असताना शंभूराजांनी त्याचा निषेध केला तसेच बहूपत्नीत्व नाकारले. महाराणी येसूबाईंना स्वतंत्र राज-मुद्रा देऊन राज्यकारभारामध्ये सामील करून घेतले. अशा थोर सेनानीचे कर्तुत्व झाकण्याचा प्रयत्न पेशवेकालीन बखरकारांनी केला. संभाजी राजांच्या कर्तुत्वाचे विकृतीकरण करणारी मल्हार रामराव चिटणीसांची बखर , संभाजी राजांच्या मृत्यूनंतर १२२ वर्षांनी , सन १८११ साली लिहिली गेली. मल्हार रामराव चिटणीसांचे खापरपणजोबा बाळाजी आवजी चिटणीस यांस संभाजीराजेंनी स्वराज्यद्रोहाच्या आरोपाखाली हत्तीच्या पायी दिले होते , त्याची मनात अढ़ी ठेऊन मल्हार रामराव यांनी बखर लिहिली. आजच्या युगातील काही तथाकथित विद्वान लेखक, नाटककार, इतिहासकारसुध्दा संभाजीराजांच्या कर्तुत्वाचे विकृतीकरण करण्यात आघाडीवर आहेत. संभाजीराजांच्या पराक्रमाची गाथा या ई-पुस्तकाद्वारे आम्ही आपल्यापुढे मांडत आहोत.

लेखक-श्री. दामोदर मगदूम.

esahity@gmail.com

# छत्रपती संभाजी महाराज . . .
# सह्याद्रिचा छावा नृपशंभू राजा. . .

छत्रपती संभाजीराजेंचा जन्म इ.स. १४ मे, १६५७ रोजी किल्ले पुरंदर येथे झाला. संभाजीराजांच्या मातोश्री सईबाईंचे निधन संभाजीराजाच्या लहान वयात झाले. त्यामुळे पुरंदर किल्ल्याच्या जवळ असलेल्या कापूरहोळ गावातील ‘धाराऊ’ राजेंच्या दुधाई झाल्या. लहानपणापासूनच बुध्दिमान असलेल्या संभाजीराजेंनी युध्दाचे डावपेच , राजकारण लवकर आत्मसात केले.



।।किल्ले पुरंदर।।.

छत्रपती शिवरायांनी संभाजीराजे अवघे ९ वर्षाचे असताना त्यांना आग्रा भेटीसाठी सोबत नेले. आग्रा भेटीवेळी संभाजी राजेंनी मोघलांची पंचहजारी मनसबदारी मिळाली होती. त्यामुळे जेव्हा औरंगजेबाने कपटाने छत्रपती शिवरायांना कैदेत टाकले त्यावेळी संभाजीराजेंचा, छत्रपती शिवरायांना खुप उपयोग झाला.

सन १६७४ साली राज्याभिषेकानंतर १२ दिवसात जिजाउंचे निधन झाले. त्यामुळे संभाजीराजे पोरके झाले. तर छत्रपती राजारामाच्या जन्मामुळे सोयराबाई संभाजीराजेंकडे दुर्लक्ष करु लागल्या. संभाजीराजे अत्यंत देखणे व शूर होते, त्यांना भ्रष्टाचार खपत नसे. शिवरायांच्या अष्टप्रधान मंडळीतील अण्णाजी दत्तोंसारख्या काही मंड्ळीचा भ्रष्टाचार संभाजीराजेंनी उघडकीस आणल्यामुळे ते संभाजी राजेंविरुध्द गेले. शिवरायांनंतर जर संभाजीराज़े गादीवर आले तर आपले काही खरे नाही असे अष्टप्रधानातील भ्रष्ट लोकांना वाटू लागले. त्यामुळे

त्यांनी महाराणी सोयराबाईंना फ़ूस लावून शिवरायांनंतर छोट्या राजारामाला गादीवर बसविण्याचे मनोरथ आखले.

छत्रपती शिवरायांनी जेव्हा दक्षिण भारतातील मोहिम आखली, तेव्हा त्यांनी संभाजीराजेंना सोबत नेण्याचा विचार केलेला होता, जेणेकरुन संभाजी राजेंना मोहिमेचा अनुभव येईल. पण छत्रपतीसोबत गेल्यावर राजेंचे कर्तुत्व शिवरायांच्या नजरेत भरेल व राजा म्हणुन ते संभाजीराजेंची निवड करतील असे वाटल्याने, अष्टप्रधान मंडळीनी.
सोयराबाईकरवी महाराजांना, संभाजीराजेंना सोबत नेण्यास विरोध दर्शविला. महाराज त्या सर्वांपुढे हतबल झाले व त्यांनी राजेंना शृंगारपूरचे सुभेदार म्हणुन पाठविले

## शृंगारपूरचे शुभेदार

छत्रपती दक्षिण मोहिमेला गेल्यानंतर अष्टप्रधानांची कारस्थाने सुरु झाली. इकडे शृंगारपूरच्या निसर्गरम्य वातावरणात संभाजीराजेंतील कवी, लेखक जागा झाला. बुधभुषणम हा संस्कृत तर ‘नायिकाभेद’ ‘नखशिख’ ‘सातसतक’ हे ब्रजभाषेतील तीन ग्रंथ त्यांनी याच कालावधीत लिहिले. यावेळी त्यांना कवी कलश यांची चांगली साथ लाभली. शृंगारपूर परिसरात दुष्काळ पडल्यामुळे रयतेकडून एक वर्ष करवसुली न करण्याचा संभाजीराजेंनी निर्णय घेतला. पण अष्टप्रधानांनी संभाजीराजेंचा हुकुम पाळण्यास नकार दिला. संभाजीराजे राज्य चालविण्यासाठी अयोग्य आहेत, असा प्रचार अष्टप्रधान मंडळींनी आरंभिला, तशी पत्रे त्यांनी कर्नाटकात मोहिमेवर असलेल्या छत्रपतींना पाठविली.

आपल्या निर्णयाला स्वराज्यात किंमत नाही, असा समज झाल्याने संभाजीराजे निराश झाले. अशातच दिलेरखानाने संभाजीराजेंना पत्र पाठवुन आपल्याकडे येण्याचा निरोप दिला. मुघलांना मिळुन त्यांची गुपिते मिळवावी असा विचार करुन त्यांनी मुघलांना सामील व्हायचा निर्णय घेतला. सभासदाच्या बखरीमध्ये याचे पुढीलप्रमाणे वर्णन आहे.

‘इतकियात संभाजीराजे राजियाचे पुत्र जेष्ठ राजियावर रुसुन मोघलाईत गेले’.

दिलेरखानाने संभाजीराजेंना ढाल करुन भुपाळगडावर हल्ला केला. शत्रुपक्षात संभाजीराजे असल्याने किल्लेदार फ़िरंगोजी नरसाळा तसेच इतर मावळ्यांनी शरणागती पत्करली. संभाजीराजेंनी सर्व मावळ्यांना सुखरुप जाऊ देण्याची मागणी दिलेरखानाकडे केली. पण दिलेरखानाने सर्वच मावळ्यांचे एक हात कलम करण्याचा आदेश दिला , तसेच त्याने आदिलशाहाच्या ताब्यातील अथणीवर हल्ला करून तेथील जनतेचा अनन्वित छळ केला. मोघलांना सामील होऊन आपण चूक केल्याचे संभाजीराजांना कळल्याने मोघलांच्या तावडीतून निसटून ते विजापुर मार्गे पन्हाळा किल्ल्यावर येऊन दाखल झाले.



॥ किल्ले पन्हाळा ॥

## छत्रपती शिवरायांची व संभाजीराजेंची ऐतिहासिक भेट

छत्रपती शिवरायांना कर्नाटकाच्या मोहिमेवर असताना संभाजीराजे स्वराज्यात परत आल्याची वार्ता समजल्यानंतर ते त्वरेने संभाजीराजेंना भेटावयास पन्हाळा किल्ल्यावर आले. तो ऐतिहासिक दिवस होता १३ जानेवारी १६८०. संभाजीराजेंची पन्हाळा किल्ल्याचा सुभेदार म्हणुन नेमणूक करून ते रायगडला परतले.

रायगडावर आल्यानंतर छत्रपतींनी ७ मार्च, १६८० या रोजी राजारामाची मुंज केली. तर १५ मार्च १६८० रोजी, प्रतापराव गुजरांची कन्या जानकी बाई हिच्याशी राजाराम यांचा विवाह केला. मनात अढी असल्याने सोयराबाईंनी संभाजीराजेंना या विवाहासाठी बोलविले नाही.

राजारामाच्या विवाहानंतर काही दिवसातच, ३ एप्रिल १६८० या रोजी छत्रपती शिवाजी महाराजांचे निधने झाले. महाराजांच्या निधनाची बातमी संभाजीराजेंना न कळवता, लहान असलेल्या राजारामला राज्याधिकारी करण्याचे अष्टप्रधान मंडळी व राणी सोयराबाईंणी ठरविले. महाराजांच्या मृत्युनंतर अठरा दिवसांनी, २१ एप्रिल रोजी राजाराम महाराजांचे रायगडावर त्यांनी मंचकारोहन केले.

# अष्टप्रधानांची कारस्थाने

राजारामाचे मंचकारोहन झाल्यानंतर , प्रधान मंडळींनी सरसेनापती हंबीररावांस , 'आम्हांस मिळुन राजारामाचा कार्यभाग साधावा' या आशयाचे पत्र धाडले. हंबीरराव मोहिते हे सोयराबाईचे सख्खे बंधु होते त्यामुळे आपल्या भाच्यासाठी ते आपल्या कटात सामील होतील असे अष्टप्रधान मंडळींना वाटले.

मोरोपंत , प्रल्हाद निराजी आणि अण्णाजी दत्तो या मंडळींनी संभाजीराजेंना अटक करण्यासाठी रायगडाहुन पन्हाळा किल्ल्याकडे प्रस्थान केले. वाटेत कराड जवळ हंबीरराब मोहिते यांना सोबत घेऊन संभाजीराजेंना कैद करावयाचा त्यांचा मानस होता. पण कराडच्या छावणीत आल्यानंतर हंबीरराव मोहित्यांनी या प्रधान मंडळींनाच कैद करून कोल्हापूरला, पन्हाळा किल्ल्याकडे कूच केली.

संभाजीराजे हेच खरे गादीचे वारस आहेत तसेच मोघलांच्या प्रचंड असा फ़ौजेशी सामना करण्याची ताकद फ़क्त संभाजीराजेंकडे आहे. हे हंबीररावांना माहित होते . त्यातच मोघल सुभेदार बहादुर खान स्वराज्याच्या तोंडाशी आला होता. अशावेळी राजारामाला गादीवर बसवून स्वराज्याचा आत्मघात करण्यासारखे होते. या कठीण समयी संभाजीराजेंसारख्या खंबीर राजाची स्वराज्याला आवश्यकता होती . हे जाणुन हंबीरमामा सारखा मुत्सद्दी सेनानी संभाजीराजेंच्या बाजुने उभा राहिला. सेनापती संभाजीराजेंकडे गेल्यामुळे प्रधान मंडळींचे सर्व कारस्थान धुळीस मिळाले. पन्हाळा किल्ल्यावर मोठ्या उदार मनाने संभाजीराजेंनी या सर्व मंडळींना माफ़ केले.



## संभाजीराजेंचा राज्याभिषेक

पन्हाळा किल्ल्याहून रायगडला रवाना होताना संभाजीराजेंनी स्वराज्यातील सर्व किल्ल्यावर दारुगोळा, धनधान्य, पाठविण्याची व्यवस्था केली . किल्ल्याची मजबूती करण्याकडे सर्व किल्लेदारांना लक्ष द्यावयास सांगून आवश्यक साधनसामग्री प्रत्येक किल्ल्यावर पाठविली. यानंतर संभाजीराजेंनी रायगडला प्रस्थान केले. रायगडची जनता आपल्या राजाचं स्वागत करावयास गडावर हजर होती. सन १६ जानेवारी १६८१ रोजी संभाजीराजेंचा राज्याभिषेक किल्ले रायगडावर झाला या प्रसंगी त्यांनी सर्व अष्टप्रधान मंडळींना माफ़ केले व परत सर्वांस अष्टप्रधानात स्थान दिले . पण पुन्हा काही महिन्याने या मंडळींनी बंडाळी केली, तेव्हा ही कायमची बंडाळी मोडून काढ़ण्यासाठी अष्टप्रधान मंडळात असलेल्यांपैकी अण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी चिटणीस त्यांचा मुलगा आवजी बल्लाळ आणि हिरोजी फ़र्जंद या सर्वांना छत्रपती संभाजींनी सुधागड परिसरात असणा-या परली गावात हत्तीच्या पायी दिले.



॥ किल्ले सुधागड ॥

## बु-हाणपूरची मोहिम

शत्रू तोंडाला आल्यामुळे ती वेळ स्वस्थ बसण्याची नव्हती. संभाजीराजेंनी लगेच बु-हाणपूरची मोहिम आखली. बु-हाणपूर हे मोघल राजवटीतील सुरतेनंतर असणारे दुसरे सधन शहर होते. त्यामुळे हे शहर लुटून मोघलांचे आक्रमण उधळून लावण्यासाठी , हंबीरराव मोहिते यांनी बु-हाणपूरवर चाल केली. मोघलांचा इतिहासकार खाफ़िखान याने या लुटीचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

बु-हाणपूर शहराच्या बाहेर बहादूरपुरा आणि इतर सात पुरे होते, मराठ्यांनी ते पुरे घेरले. मराठ्यांनी शहरावर इतक्या अनपेक्षितपणे हल्ला केला की , शहरातील लोकांना एकही पैसा हलवता आला नाही. देशोदेशीचे जिन्नस , जडजवाहीर, सोने- नाणे , रत्ने यांनी भरलेली बाजारपेठ मराठ्यांनी लुटली.

## मोघलांशी लढा

सन १६८१ साली औरंगजेबाचा पुत्र शहजादा अकबर , औरंगजेबाविरुध्द बंड करुन संभाजीराजेंना येऊन मिळाला. मराठ्यांचे राज्य जिंकणे आणि शहजादा अकबरास शासन करणे हे दोन हेतु मनात ठेऊन औरंगजेबाने दक्षिण मोहिम आखली. प्रचंड सैन्यासह व नामांकित सेनानींना घेऊन त्याने दक्षिणेला कूच केली. वाटेतील गावागावात विध्वंस करत तो नोव्हेंबर १६८१ च्या सुमारास औरंगाबादला पोहोचला. नासिकजवळ असलेल्या रामसेज किल्ल्याला मोघल सेनानी शहाबुद्दीनखानने वेढा दिला.

## सिद्दिचा बंदोबस्त

मोघलांचे स्वराज्यावर आक्रमण आले होते याचा फ़ायदा घेऊन सिद्दिने कोकणकिनारपट्टीवर खूप उच्छाद मांडला होता. सिद्दिला मोघल, इंग्रज व पोर्तुगीज यांची मदत मिळत होती. १६८२ मध्ये संभाजी राजांनी सिद्दीचा कायमचा बंदोबस्त करण्याचा निश्चय केला. प्रथम संभाजीराजेंनी सिद्दीच्या हबशी मुलखावर हल्ला करुन तो जिंकुन घेतला कारण सिद्दिला तेथून रसद मिळत होती.

राजापुरी गावातुन नजरेच्या टप्प्यात असलेल्या जंजिरा किल्ल्याला दर्यात बुडविण्याचा विचार करून संभाजीराजेंनी आक्रमण केले. पण किल्ल्याच्या बुरुजापर्यंत मराठ्यांच्या तोफ़ेचा मारा पोहोचत नसल्यामुळे जंजिराच्या बुरुज शाबुत होता. सिद्दी खैरतने किल्ल्याचा बंदोबस्त मोठा चोख ठेवला होता. सिद्दी खैरतच्या कलाल बांगडी, लांडा कासम, चावरी या मोठ्या तोफ़ांच्या मा-यापूढे मराठ्यांची गलबते दर्यात बुडत होती.

अशा वेळी संभाजीराजेंनी धाडशी निर्णय घेऊन, ओहोटीच्या वेळी समुद्रात भराव टाकून पुल बांधण्याचे ठरविले, जेणेकरुन तोफ़ेचा मारा जंजिराच्या बुरुजापर्यंत पोहोचेल. समुद्रात काही अंतरावर भराव टाकल्यानंतर मराठ्यांनी आपल्या मोठ्या तोफ़ा काढुन किल्ल्यावर मारा चालु ठेवला त्यामुळे किल्ल्याचा बुरुज कोसळुन किल्ल्यामध्ये ठिकठिकाणी आग लागली. रात्रीच्या वेळी सिद्दि खैरत व कासम किल्ला सोडुन इंग्रजांच्या आश्रयाला मुंबईला पळून गेले. किल्ला मराठ्यांच्या ताब्यात आला असे वाटले असतानाच मोघल सरदार हसन अलिखान कल्याणमार्गे रायगडच्या दिशेने येत असल्याचे समजल्यामुळे संभाजीराजेंना ही मोहिम अर्धवट सोडावी लागली. पण संभाजी राजेंनी जंजिरा खिळखिळा केल्यामुळे , सिद्दिने पुन्हा मराठी मुलुखात पाय टाकण्याचे धाडस केले नाही. संभाजीराजेंनी एकाच वेळी मोघल , सिद्दी , इंग्रज, पोर्तीगीज यांच्याशी लढ़त होते.



॥ किल्ले जंजिरा ॥

## रामसेजचा ऐतिहासिक लढा

इकडे नासिकच्या जवळ असलेल्या रामसेज किल्ल्याला मोघल सेनानी शहाबुद्दिनखानने वेढा दिला होता. औरंगजेबाला वाटले कि काहि तासातच किल्ला पडेल पण किल्ला जिंकायला त्याला तब्बल साडेसहा वर्षे लागली. या कालावधीत त्याने वेगवेगळे सेनानी किल्ला जिंकावयास पाठविले. रामसेजचा किल्लेदार सुर्याजी जेधे हा मोठा पराक्रमी होता. मराठ्यांनी हा किल्ला झुंजवत ठेवला. किल्ल्याला घातलेला वेढा मारण्यासाठी रुपाजी भोसले, मानाजी मोरे, हंबीरमामा यांना संभाजीराजेंनी पाठविले. या कालावधीत स्वतः संभाजीराजेंनी किल्ल्या वर रसद पुरविली. अखेरीस किल्ल्यावरची रसद संपल्यामुळे मराठ्यांनी किल्ला सोडुन दिला.

याच सुमारास संभाजीराजेंनी गोव्याचे पोर्तुगीज आणि म्हैसूरचा चिक्कदेवराय यांच्याविरुध्द आघाडी उघडण्याचा निर्णय घेतला. मराठ्यांचे राज्य जिंकण्यात येत असलेल्या अपयशामुळे औरंगजेबने आदिलशाही जिंकून घेण्याचा विचार केला.



॥ किल्ले रामशेज ॥

# म्हैसूरकर चिक्कदेवराजाचा बंदोबस्त

मराठ्यांची जहागीर एंकोजीरावांनी बंगलोरहून, तंजावरला हलविल्यापासूण म्हैसूरकर चिक्कदेवराजा खूप माजला होता. त्याचा बंदोबस्त करणे गरजेचे होते. रामसेजचा लढा चालू असल्यामुळे औरंगजेब नजीकच्या कालखंडात घाटमाथ्यावर उतरण्याची शक्यता कमी होती. त्यातच पावसाळ्याचे दिवस जवळ आले होते. औरंगजेबाबरोबरच्या निर्णायक युद्धात कर्नाटक, तामिळ प्रातांतुन येणारी रसद महत्वाची ठरेल हे संभाजीराजेंनी ओळखले होते. कर्नाटक, तामिळ प्रातांतील जहागीर त्यासाठी शाबुत ठेवणे गरजेचे होते. त्यामुळे संभाजीराजेंनी कर्नाटक, तामिळ प्रातांवरील मोहिमेचा बेत आखला.

चिक्कदेवराजाची ताकद पहिल्यापेक्षा वाढल्यामुळे म्हैसूरवर हल्ला करणे संभाजीराजेंना योग्य वाटले नाही. त्यामूळे शत्रुला गुहेतुन बाहेर काढुन त्याबरोबर लढ़ावे असा विचार त्यांनी केला, तामिळ प्रांतातील चिक्कदेवराजाच्या ताब्यात असलेल्या त्रिचनापल्लीच्या (सध्याचे त्रिची शहर) पाषाणकोट किल्ल्यावर आक्रमण करण्याचा निर्णय घेतला.

संभाजीराजेंच्या सोबतीला बसप्पा नाईक ह्क्केरी , गोवळकोंड्याचा दिवाण मादण्णा पंडीत तसेच तंजावरच्या एंकोजीरावांच्या सैन्याची कुमक होती. पहाटेच्या सुमारास होडीचा आधार घेत संभाजीराजेंच्या सैन्याणे दुथडी भरुन वाहणा-या कावेरी नदीत घोडी घालुन कावेरीचा किनारा गाठला. मराठ्यांच्या अचानक झालेल्या हल्ल्यामुळे शहरात अफ़रातफ़री माजली. संभाजीराजेंनी पाषाणकोट किल्ल्यावर जोरदार हल्ला चढविला. गडावरील मदुरेकर नायकाच्या शिबंदीने जोरदार प्रत्युत्तर दिले. पण शेवटी कवी कलशाच्या नेतृत्वाखाळी तिरंदाजांच्या पेटत्या बाणांनी किल्ल्यावरील दारुगोळ्याला आग लागुन बुरुज उडाला व अखेर किल्ला मराठ्यांचा ताब्यात आला.

संभाजीराजेंनी चिक्कदेवराजाकडून मोठी खंडणी वसूल केली. या कालावधीत संभाजीराजेंनी कर्नाटक व तामिळ प्रातांत मोठा मुलुख मारला. या प्रांतातील बावीस किल्ले मराठ्याचंचा ताव्यात आले. मोठी खंडणी तसेच रसद स्वराज्याला मिळाली. कर्नाटकातील धर्मपुरी - होसुर पासुन तामिळ प्रांतातील जिंजी वेलुरापर्यंतचा प्रदेश मराठ्यांच्या घोड्याच्या टापाखाली आला.



## ॥ त्रिचिचा पाषाणकोट किल्ला॥

### संगमेश्वरला दगा

सन १६८५ साली एप्रिल महिन्यात मोघलांच्या सैन्याने विजापूरला वेढा घातला. औरंगजेबाचा शहजादा आज्जम याने हा वेढ़ा आणखी मजबूत केला. विजापुर वाजविण्यासाठी संभाजीराजेंनी आपले विश्वासू छंदोगामात्य कवी कलश यांना आदिलशाहाच्या मदतीस पाठविले. पण अखेरीस १२ सप्टेंबर १६८६ साली विजापूर मोघलांच्या ताव्यात पडले.

आदिलशाही जिंकल्यामुळे आता औरंगजेबला कोणताही शत्रु उरला नाही. त्याने आता पुर्ण शक्तीनिशी मराठी मुलुखावर वेगवेगळ्या आघाड्या उघडल्या. शत्रु अगदी रायगडाच्या पायथ्याशी आला होता. अशातच सन १६८७-८८ साली पडलेल्या दुष्काळाने रयतेचे हाल झाले. संकटे चोहोबाजुंनी आलेली होती, या संकटांच्या समयी स्वराज्यातील अनेक सरदार , वतनाच्या आशेने मोघलांना मिळाले होते यामध्ये खुद्द शिवरायांचे जावई गणोजी शिर्के , महादजी निंबाळकर आणि हरजीराजे महाडीक होते. समय खूप कठीण होता अशा वेळी पुढील

रणनीती ठरविण्यासाठी संभाजीराजेंनी सर्व सरदारांना बैठकीसाठी कोकणात संगमेश्वर येथे बोलविले यावेळी कोकणात यावयाच्या सर्व वाटांवर संभाजीराजेंनी बंदोबस्त ठेवला होता.

संगमेश्वरची बैठक संपवुन रायगडला निघतेवेळी, हेरांनी संगमेश्वरवर, संभाजीराजेंचा मेहुणा गणोजी शिर्के आणि औरंगजेबचा सरदार मुकर्रबखान यांनी हल्ला केल्याची बातमी आणली. गणोजी शिर्के हा पुर्वी शृगारपुरचा वतनदार होता त्यामुळे त्याला या भागातील दुर्गम वाटांची माहिती होती. याच दुर्गम वाटांनी तो मोघली सैन्याला घेऊन आला होता.

त्यावेळी संगमेश्वरला संभाजीराजेंसोबत महाराणी येसुबाई होत्या. अवघे चारशे-पाचशे सैन्य यावेळी राजांसोबत होते. शत्रुने अचानक हल्ला केल्याने मोठी हातघाई झाली. यासमयी येसूवाईंना , धनाजी जाधव व काही सैन्यासह त्यांनी पुढे पाठविले. शत्रुला गुंगारा देण्यासाठी संभाजीराजे, कवि कलश व काही निवडक साथीदार दुर्गम वाटेने गेले. पण याभागातील वाटांची माहिती गणोजी शिर्केस असल्याने ते पकडले गेले. संभाजीराजेंना त्यांच्या सहका-यासह पकडुन दुर्गम जंगलातील वाटेने नेण्यात आले. वाटेत जाताना ते ओळखु नयेत म्हणुन सर्वांचे केस कापले गेले, तोंड बांधले गेले.

## संभाजीराजेंची क्रुर हत्या

संभाजीराजे आणि कवि कलश यांची धिंड काढुन त्यांना औरंगजेबासमोर हजर करण्यात आले. या घटनेबद्दल मोघलांचा इतिहासकार खाफ़िखान लिहितो, “संभाजी व कवीकलश यांची धिंड जेव्हा परतली तेव्हा औरंगजेबने आपला दरबार भरवला आणि या कैद्यांना दरबारात आणले. त्यांना पाहताच औरंगजेब तख्तावरुन खाली उतरला. ईश्वराच्या या उपकाराप्रित्यर्थ दोन रुकात पढल्या. औरंगजेब गुडघे टेकुन ईश्वराची प्रार्थना करीत होता. हे पाहिल्यानंतर कवी कलश संभाजीराजेंकडे पाहून म्हणाला,

‘राजन हो तुम सॉच खरे, खूब लढे तुम जंग ।

देखत तव चंडप्रताप जही, तखत त्यजत औरंग ।

हे संभाजीराजा तू सच्चा वीर आहेस, तुच जबरदस्त योध्दा आहेस. तुझा हा प्रचंड पराक्रम पाहून स्वतः औरंगजेबाने आपले राजसिंहासन त्यागून तुझ्यापुढे तो नतमस्तक झाला आहे.

esahity@gmail.com

संभाजीराजेंच्या मृत्युबद्दल ‘आलमगीर विजय’ या फ़ारशी ग्रंथात (हा औरंगजेबाचा मुख्य न्यायाधीश शेख उल इस्लाम याचा कारकून असलेल्या ईश्वरदास नागर याने लिहिलेला आहे) पुढ़ीलप्रमाणे लिहिले आहे. “बादशाहाच्या आज्ञेने, इखलासखान आणि बहादूरखान हे संभाजीराजे, कवी कलश व इतर साथीदारांना घेऊन बादशहाच्या छावणीजवळ आले. बादशहाच्या आज्ञेवरुन या सर्वांची उंटावरुन धिंड काढण्यात आली. त्यानंतर त्यांना छावणीजवळ आणण्यात आले. इखलासखान आणि हमीदुद्दीन खान यांनी संभाजीराजेंना बादशहास ताजीम देण्यास सांगितले पण संभाजीराजेंनी त्यांचे ऐकले नाही. संभाजीराजे, कवी कलश व इतर साथीदारांच्या पायात बेड्या ठोकण्याचा बादशहाने आदेश दिला.

बादशहाने रहुल्लाखान करवी, मराठेशाहीतील खजिनाबद्दल तसेच बादशहाच्या सरदारापैकी ज्यांचे संभाजीराजेंशी संबध होते याची माहिती काढण्याचा खुप प्रयत्न केला पण संभाजीराजेंनी काही सांगितले नाही. अखेरच्या कालखंडात संभाजीराजे, कवी कलश व त्यांच्या सहका-यांचे खुप हाल करण्यात आले. सर्वांनी अन्नाचा त्याग केला. शेवटी चिडून जाऊन बादशाहाने पुण्याजवळील मौजे तुळापूर येथे सर्वांची क्रुर अशी हत्या करण्यात आली. हत्येनंतर संभाजीराजेंच्या शरीराचे अवषेश गोळा करून त्यांच्यावर अत्यंसस्कार केल्यावर वढू बुदुक येथील रयतेने त्यांची समाधी बांधली.



॥ तुळापूर ॥

# छत्रपती संभाजीराजेंचा जीवनपट

| | |
|---|---|
| १६७५ | माघ वद्य ५ संभाजीराजांची मुंज झाली |
| १६७६ | ६ऑक्टोबर(अश्विन विजयादशमी) शिवाजीराजे कर्नाटक स्वारीवर रवाना ,संभाजीराजे शृंगारपुरला रवाना |
| १६७६ | राजापुर वखार संदर्भात तडजोडीचे काम संभाजीराजेंवर |
| १६७७ | १ ऑक्टोबर १६७७ इंग्रजाकडून आपल्या पत्रात संभाजीराजेंची स्तुती |
| १६७८ | २३ मार्च शृंगारपुरला  कविकलश ,शिवयोगी व इतर उपासक यांच्याकडून संभाजीराजेंना कलशाभिषेक |
| १६७८ | एप्रिल छत्रपती शिवरायाचा दक्षिणेत प्रचंड दिग्विजय |
| १६७८ | सप्टेंबर संभाजीराजे व येसुबाईंना शृंगारपुरला कन्यारत्न( नाव भवानीदेवी) |
| १६७८ | ३ सप्टेंबर(कार्तिक) छत्रपती शिवरायांच्या सांगण्यावरून संभाजीराजे  परळीकडे रवाना |
| | ३ डिसेंबर (मार्गशीर्ष) कृष्णा-वेण्णा संगमावरून (संगम माहुली) दिलेरखानाकडे रवाना |
| | १३ डिसेंबर कुरकूंभ येथे संभाजीराजे व दिलेरखान यांची भेट |
| १६७९ | २ एप्रिल संभाजीराजेंची मदत घेऊन दिलेरखानाने भूपाळगड जिंकला |
| | २१ डिसेंबर मोघलाकडून निसटून विजापुरच्या मसूदखानाच्या मदतीने संभाजीराजे पन्हाळा गडावर परतले |

esahity@gmail.com

| | |
|---|---|
| १६८० | १३ जानेवारी संभाजीराजेची छत्रपती शिवाजीराजे बरोबर पन्हाळगडावर ऐतिहासिक भेट |
| | ३ एप्रिल चै.शु.१५ छत्रपती शिवाजी महाराजांचे रायगडवर महानिर्वाण,संभाजीराजेना हे वृत्त कळवले गेले नाही |
| | २१ एप्रिल १० वर्षाच्या राजारामचे अष्टप्रधान मंडळी कडून रायगडावर मंचकारोहन,त्याच दिवशी मोरोपंत,अण्णाजी दत्तो |
| | संभाजीराजेंना कैद करण्यासाठी पन्हाळा किल्ल्याकडे निघाले पण कऱ्हाडजवळ हंबीरराव मोहितेकडून त्यांना कैद |
| | २७ एप्रिल संभाजीराजेंनी पन्हाळा किल्ल्यावरून राजकारभारास सुरूवात केली |
| १६८० | १८ जून संभाजीराजेंचे रायगडावर आगमन |
| | २७ जून (श्रावण एकादशी) पुतळाबाई सती गेल्या |
| | २० जूलै( नागपंचमी) संभाजीराजेंचे मंचकारोहन |
| १६८१ | १६ जानेवारी संभाजीराजांचा रायगडावर राज्याभिषेक (१४-१५ माघ) |
| | ९ मे औरंगजेबचा पुत्र शहाजादा अकबर संभाजीराजेकडे आश्रयास |
| | १० जून -१७ जून नेताजी पालकर व हिरोजी फर्जंद यांना अकबराच्या भेटीसाठी संभाजीराजेंनी पाली गडावर पाठविले |
| | ऑक्टोबर शहाजादा आजम( औरंगजेबचा तृतीय पुत्र ) अकबरास पकडण्यासाठी बऱ्हाणपुरला रवाना |
| | १३ नोव्हेंबर संभाजीराजा व शहाजादा अकबर ची पाली धोंडसे येथे भेट |

| | |
|---|---|
| १६८३ | २२ मार्च औरंगजेबाचे औरंगाबादला आगमन |
| | १८ मे संभाजीराजेंना पुत्ररत्न ,शिवाजी हे नामाभिमान(शाहूराजे सातारा) |
| | डिसेंबर संभाजीराजेंचे अंबरच्या राजारामसिंहास पत्र ,दिल्ली दरबारी धडक देण्याची योजना |
| १६८३ | जानेवारी-फेब्रुवारी हंबीररावाकडून शहाजादा आजमचा पराभव |
| | १ नोव्हेंबर संभाजीराजेंनी फोंड्यास वेढा घातला.येसाजी कंक व कृष्णाजी कंक यांचा पराक्रम |
| | २३ डिसेंबर कवी कलश यांना कुलमुखत्यारपद |
| १६८४ | ७ जानेवारी भीमगडावर कवी कलशाचा फिरंग्याशी तह |
| | १५ शहाआलमकडून डिचोली शहर(गोवा) उध्वस्त |
| | १८ मे मराठ्यांच्या छुप्या हल्ल्याने त्रस्त शहाआलम अहमदनगरला रवाना |
| १६८५ | फेब्रुवारी बादशाहकडून सफूल्लाखानास खिल्लत |
| | ११ औरंगजेबाचा कुतूबशाहस खंडणी देण्याचा आदेश |
| १६८६ | १३ सप्टेंबर औरंगजेबचा विजापुरवर विजय |
| | १६ डिसेंबर औरंगजेब गोवळकोंड्याकडे रवाना |
| १६८७ | फेब्रुवारी शहाजादा अकबर इराणकडे जहाजाने रवाना |
| | २७ सप्टेंबर गोवळकोंड्याच्या कुतूबशाहीचा अस्त |
| | ऑक्टोबर सेनापती हंबीरराव मोहितेंचा मृत्यु |

| | |
|---|---|
| १६८८ | ऑक्टोबर-नोव्हेंबर कवी कलश व गणोजी शिर्के यांच्यात संघर्ष शिरकाण  शिर्केकडे |
| १६८९ | १ फेब्रुवारी संभाजीराजेंकडून गणोजी शिर्केचा पराभव,संभाजीराजे संगमेश्वरला रवाना |
| | ३ -७फेब्रुवारी मुकर्रबखानाने संभाजीराजे व कवी कलश यांना गणोजी शिर्के व रंगनाथ स्वामीच्या मदतीने  कैद केले |
| | ९ फेब्रुवारी राजारामचे रायगडावर मंचकारोहन |
| | १५ संभाजीराजे व कवी कलश यांना बहादूरगडावर औरंगजेबसमोर उभे केले गेले |
| | ९ मार्च संभाजीराजेंच्या अटकेची वार्ता ऐकून  हरजी महाडिक यांनी केसो त्रिमल यांनी जिंजीस अटक केली |
| | ११  मार्च फाल्गुन अमावस्या संभाजीराजे व कवी कलश यांचे वढू येथे हनन |

# ।। नृपशंभू ।।

संभाजीराजेंनी लिहिलेल्या 'बुधभूषणम्' या संस्कृत व 'नायिकाभेद', 'नखशिख', 'सातसतक' या  ब्रजभाषेतील  ग्रंथामधील काही निवडक श्लोक.

## नायिकाभेद मधील निवडक श्लोक

### सवैया

राधिका कान्ह विरंची रची सब । लोकनकी सुखमा सबे सैलै ॥
अंगके रंगन के ढिग जात व्हैं ।  जात है शंभु सबे रंग मैलै ॥
लालनसों परवालनसों बँधी ।  लालन जानि पेरे बहि गैलै ॥
पाय धरे जितही वह बाल । तही रंग लाल गुलालसों फैलैं  ॥

अर्थ: राधा आणि कन्हैयाची जोडी विश्वनिर्मात्याने पृथ्वीवरील सर्व पहाडातील सौंदर्य एकत्र आणून तयार केली आहे.त्यांच्या शरीरावर सर्वात सुंदर अशा रंगाच्या छटा आलेल्या आहेत.शंभुराजे म्हणतात,'विधात्याने त्यावेळी सगळे रंग जवळ ठेवून या जोडीची निर्मिती केली आहे,त्यामुळे त्या सगळ्या रंगाचा मिलाप त्यांच्यात  झालेला दिसतो.या जोडीला प्रवाळाने बांधले असावे.जिथे जिथे ही जोडी पाय ठेवते तेथे लाल गुलाबी रंगाची उधळण होत आहे'.

# परकीय ऊहा

नलिनी विधू मध्यको औट करै । जूट फूटै जुटका उडावहिको ॥
मन चूंबक बीचको लोहा भयो । तहां दुसरो रूप दिरवावहिको ॥
कवि संभु सनहेकी रीति यही । विच्छुरें जल मीन जियावहिको ॥
गुनवारे गुपालकी आंखिनतें । अरूझे अखियाँ सार तजावहिको ॥

अर्थ: ब्याही पर प्रेम कमलिनीवासी चंद्राला पाहून फटून पडून मध्येच विकसीत झाली.तारांगणात चमकणारा तारा निखळून लोखंड झाला आहे.कवि शंभु म्हणतात, 'प्रेमाची हीच रीत असते,पाण्यातून बाहेर पडून तडफडणाऱ्या माशासारखी त्याची अवस्था असते.गोपाळकृष्णाना डोळयात साठवून,डोळयाच्या सरोवरात ते डुंबून गेले आहेत '.

# सवैया प्रोषितपतिका

बालमके बिछुरे बढी बालकें । व्याकुलता विरहा दुखदानतें ॥
चौपरि आनि रची नृपशंभु । सहेलिनि साहिवनी सुखदानते ॥
तू जग फुटे न मेरि भटू यहो । बात कही सखियाँ सखियांनते ॥
कंजूसे पानिसे गिरे । असुंवा गिरे खंजनसी अँखियानते ॥

esahity@gmail.com

अर्थ: पतीच्या विरहामुळे,वयाने लहान असलेली नायिका दुखी झालेली आहे.तिला पतीचा विरह सहन होत नाही.विरहामुळे तिचा केससंभार विस्कटला आहे.

नृपशंभु (कवी) म्हणतात, 'तिने विरह विसरण्यासाठी आपल्या सखींसोबत खेळ सुरू केला आहे.आपल्या सखींमध्ये अश्रुभरीत नयनाने माझी जोडी फोडू नका अशी इच्छा ती व्यक्त करते.तिच्या नेत्रातून पाणी टपकत आहे जणू काही खंजन तुल्म सुंदर काळ्या कपाळी भोर डोळयातून हे अश्रू आले आहेत'.

## नाइन दूती

राधिका के परवालसें हाथन । लाल हरी घिरी लालि लुनाइ ॥
देखत ही बनी आपत कान्ह कहा ।करिये कवि शंभु बढाई ॥
लालि लसै अंगुरीन के बीच । तहाँ नख चंदन की छबि छाई ॥
कोपन की अहनाई में आनि मिलि । मनो बीचहि बीच जुन्हाई ॥

अर्थ: प्रवाळासारख्या असणाऱ्या राधेच्या हातात श्रीलाल कृष्णाची सुंदरता वेढली गेली आहे.कवि शंभु म्हणतात, 'तिला पाहताच तिची प्रशंसा केली गेली .ती सुंदरता बोटांच्या नखामध्ये जणू चंदनाप्रमाणे सुगंधीत व सौंदर्य कोपराच्या आरशामध्ये एक झाली आहे.मधून मधून चांदण्याच्या चमचमण्याचा भास होत आहे.राधेच्या सुंदर हातात श्रीलाल कृष्णाचे प्रतिबिंब व कोपराजवळील आरशात या दोघांचे प्रतिबिंब ( चंद्र व चांदणे )एक झाले आहे'.

# नखशिख मधील निवडक श्लोक

## श्री गणजूलिखिते संभूकृत नखशिख

पद पद पत्र सम चरण जंघ जिमी कनक कर मकर ॥
नाभी ललित गभीर, उदर लंबित विसाल वर॥
उर दीरघ अति मंजु चारि कर, देत चारि फल॥
एक दंत अरू सुंड लषत, हरि जात सकल मल॥
अति नैन चारू ढाली फलक श्रवन सीस छविसों मढत ॥
ग्यान होत अग्यान के सो गननायक गुन पढत ॥

अर्थ: गणेशाचे पाय हे कमलपात्राप्रमाणे समचरण ,जांघ सोनेरी माशांची बनविलेली असून ,नाभी खोल तर पोट लांब आहे.गणेशाची छाती अत्यंत विशाल असून चार हात धर्म,अर्थ,काम व मोक्ष आहेत.एक दात आणि सोंड ही सगळ्या पापाचे हरण करीत आहेत.अत्यंत सुंदर डोळे,मोकळे कान व शिर्ष सौंदर्याने नटवलेले आहे.गणेशाचे गुणगान केल्यामुळे अज्ञानी मनुष्यही ज्ञानी होतो.

# रोडी वर्णन कवित्व

राधिका रोडी कोऊ कौंहरसी कहे सोन ।
मेरे चित्त दरगंध  कहवाइ ॥
शंभुराज कोऊ  कोऊ लालसी नरपानै तेतो ।
निपट निदानै वा कठौरता निघटवर ॥
यह तो नरम नैन देखत सुधासो पियैं ।
चुपरि अतर जों निसावति सुगंध झर ॥
रंजन मनाहि दुख भंजन सकल मनो ।
सुमन गुलाबकों दब्यो है कंजफूल तर ॥

अर्थ:राधिकेची रोडी(टाच) ही सुवर्णकमळाप्रमाणे आहे असे कोणी म्हणतात.कवि शंभुराज म्हणतात,माझे अंतकरण तिला चोहोकडून घेरलेला सुगंध धारण केला आहे असे म्हणते.कुणी तिला लाललाल श्रेष्ठ खंड म्हणतात.अत्तर शिपडून निर्माण झालेल्या सुगंधाच्या झऱ्याची उपमा तिला देत आहोत.सर्वांच्या दुखाचे निवारण ती अगदी आनंदाने करीत आहे.गुलाबांच्या फुलांनी दबवून टाकल्याप्रमाणे तसेच ओल्या बह्मकमळाप्रमाणे ती दिसत आहे.

## पग वर्णन सवैया

कौहर कौल जपादल विद्रुम । का इतनीज बंधुकर्म कोति है ॥
रोचन रोरी रची मैहंदी । नृपशंभु कहे मुकता सम पोति है ॥
पाय धरैं ढरै इंगुरसो तिनमें । मनि पायलकी धनी जोति है ॥
हाथ व्हैं तीन लौ चारिह औरसो ।चांदणी चूनरीके रंग होति है ॥

अर्थ:राधिकांचे पाय लाल रंगाच्या (कौहर) फळासारखे तसेच लाल रंगाच्या कमळासारखे ,पुष्पाप्रमाणे पिवळेधमक तसेच पोवळयासारखे लाल दिसतात.जसे विविध दिशांना उमललेले दुपहरीयांचे फळच.सखीच्या गोंधळात पायास मेहंदी लागली आहे.कवी नृपशंभु म्हणतात, जणू काही मोत्यांचा लेप पायास लावला आहे व सिंदूरच पायातून ओघळत आहे. मण्याची माळ खुपच चमकत आहे,चारी बाजूंनी ती सहेलींनी घेरली गेली आहे.तिची बुनकीदार ओढणी चमकदार चंद्रप्रभेप्रमाने शोभत आहे.

## मुख

राधिका के आनन को बरनन कहा कीजै ।
देखि नैन जै सो जुडावै सींची सुधा झर॥
संभुराज वृजराज प्रान को अधारे ताको ।
पावै कौन पार सो बखानै सोभा कौन वर ॥
सहसन कोटि जोति ओटि के इकठ्ठे कियो ।
कैधो चतुरान सभेत दियो बर हर ॥

esahity@gmail.com

फैलपट मंजु पर प्रफुल्लित कंज कैधों ।
बसि रह्यो ससि आइ कंचन की बेलि पर ॥

अर्थ: राधेच्या मुखाचे वर्णन काय करावे ? ज्याने ते पाहिले त्याला तो अमृताचा निर्झर प्रवाहीत आहे असे वाटू लागले.कवी शंभुराज म्हणतात
वृजराज श्रीकृष्णांना तो प्राणाधार आहे.तिच्या सौंदर्याचे वर्णन कोण करू शकेल?
सहस्त्र ज्योती एकत्र करून बह्मदेवाने ते निर्माण केले आहे.
साक्षात भगवान शंकराने शंभुराजास वर दिला आहे.
असे प्रफुल्लित कमळ कामदेवाने निर्माण केले आहे.तिच्या सुवर्ण वेलीवर राहण्यासाठी चंद्रच आला आहे.

## सातसतक मधील निवडक श्लोक

सीता पग नष चंद की भजि कै संभ समाज ।
सातशतक ग्रंथहि रच्यो,संतन के हित काज ॥

अर्थ: सीतेच्या चरणाच्या नखचंद्रास आराधून शंभु राजांनी समाजाच्या व साधूसंताच्या हितासाठी सातशतक ग्रंथाची निर्मिती केली आहे.
शंभुराजे म्हणतात की माझे मन संताच्या हितासाठी भमर झाले आहे.

मो मन मधुकर संत हित भऱ्यो ग्रंथ रसविंद ।
चित्रकूट के सिर्लान जे फूल पग अरविंद ॥

अर्थ: यात चित्रकुटमधील प्रभु राम,सीता आणि लक्ष्मण यांच्या पवित्र चरणाच्या प्रभावाने जे पारिश्रमिक फूल तेथील दगडावर फुलले तोच प्रेम रस होय.

सो रस पाइ छके महा सनकादिक सुक सेस ।
संभराज षगराज ,मुनि ,गिरजा ,गिरा गणेश ॥

अर्थ: तो रस प्राशन करून शुक्राचार्य,शेषदेव,सनकादिक मुनि तसेच खगराज गरूड,गिरीवरकन्या पार्वतीदेवी,सरस्वती,गणेश तसेच शंभुराजे संतुष्ट झाले.

उपालंभ कहि विनै कहि ,जगत सीष कहि ध्यान ।
बह्म निरूपम कुछ कहरो,जाते बाढत ग्यान ॥

अर्थ:

उपहासात्मक बोलण्यापेक्षा जगाच्या शिकवणुकीकडे माझे लक्ष आहे.काही ब्रह्मनिरूपणात्मक सांगण्याची माझी इच्छा आहे.त्यामुळे ज्ञानवृध्दिही वाढते.

छत्र,गज,चमर,तुरंग अगनित संग ।
एते पर मन ना गरूर गहियतु है ॥
असन विहूँने अंग वे वसन सूँने राषो ।
लोक निंदा भाषो सुष मानि सहियतु है ॥
दूषण तुम्है जे देत मुगुध अचेत प्रभु ।
करिहौ उहे पे जाको जैसो चहिअतु है ॥
सैंभ षोइ महीपाल कहै सुनिए गोपाल ।
हम हरि हाल तुम सौ निहाल रहियतु है ॥

अर्थ: छत्रपती असल्यामुळे संभाजीराजेजवळ छत्र,गज,चामर,असंख्य घोडे इ.ऐश्वर्याच्या वस्तू असल्यातरी त्याबद्दल शंभुराजेंच्या मनात अहंकार नव्हता.शंभुराजासारख्या क्षत्रिय राजामधील वैराग्य रूप पाहून काही लोकांनी त्यांची निंदाही केली पण त्यातच सुख मानुन ती त्यांनी सहन केली.दृढनिश्चयी शंभुनी त्यात सुख मानिले आणि स्वत:ला परमेश्वरास अर्पण केले.जो परमेश्वरास दूषण देतो ते मुढ अचेतन होते.त्यांना ही तो अचेतनाही सुंदर करतो.जो परमेश्वराची इच्छा धरितो त्याचे परमेश्वर समाधान करतात.शंभुराजे गोपाळास(श्रीकृष्णास) म्हणतात,'मी माझी सारी जबाबदारी तुझ्यावर सोपवितो'.

वृंदावन कुंजन में गुंजत मधुप कुंज ।
कुंज बनि रहे सुर लोक के अषारे से ॥
तहाँ संभुराज मैं विलोके वृजराज जा पैं ।
अंग अंग वरिए अनंग अंग छोर से ॥

अर्थ: वृंदावनतील कुंज वनात भ्रमरवृंद गोड गुंजन करीत आहेत.हे वृंदावन उद्यान देवाच्या भूमीतही शोभून दिसत आहे.तेथे कवि शंभुराजांना व्रजराज श्रीकृष्णांच्या अंग प्रत्यंगावर आपली गात्रे ओवाळून टाकावीत असे वाटते.

# बुधभूषण मधील निवडक श्लोक

## राजाची सामान्य कर्तव्ये

व्यसनानि च सर्वाणि भूपतिः परिवर्जयेत् ।
सप्तदोषा सदा राज्ञा हातच्या व्यसनोदया: ॥

अर्थ: राजाने सात दोष टाळले पाहिजेत,हे दोष पुढीलप्रमाणे आहेत
वाग्दण्ड -राजाने कठोर बोलणे टाळावे
पारूष्य - इतरांचा अपमान करणे टाळावे

दुरयातंच-संरक्षणाशिवाय राजाने दुर जाऊ नये
पान-मद्यपानापासून दूर असावे
स्त्री-राजांस स्त्रीचे व्यसन नसावे
मृगया-गरीब प्राण्याची शिकार करू नये
द्युत-जुगारापासून राजाने दुर राहावे

काले मृदुर्यो भवति काले भवति दारूण: ।
राजा लोकद्वयापेक्षी तस्य लोकद्वंय भवेत ॥

अर्थ: राजामध्ये मवाळ व कठोर अशा दोन्ही वृती असाव्यात.वेळ आल्यावर राजाने कधी कठोर तर कधी मवाळ बनावे

भृत्यै: सह महीपाल: परिहासं च वर्जयेत् ।
भृत्या: परिभवन्तीह नृपे हर्षवशंगतम् ॥

अर्थ: राजाने नोकराबरोबर थट्टा मस्करी करू नये.नोकरांच्या वेढ्यातील राजा हर्षवश होऊन नंतर तिरस्कृत होतो.

# छत्रपती शहाजीराजे यांचे सुबक

भृशबदान्वयसिन्धू सुधाकर: प्रथितकीर्तिरूदारपराक्रम:|
अभवतर्थकलासु विशारदो जगति शाहनृप: क्षितिवासव: ||

**अर्थ:** सर्वशक्तिमान,सामर्थ्थवान असलेला पृथ्वीतलावरील सर्वश्रेष्ठ असा राजा किंवा प्रत्यक्ष शिवाचा अवतार असलेला उदार ,पराक्रमी आणि अर्थकारण व राजकारणातील धुरंदर अशा विविध गुणांचा संगम झालेला हा नृपथोर राजा गुणसागरातील चंद्राप्रमाणे शोभत होता.
असे सिंधु सुधाकरासारखे प्रचंड पराक्रमी,कार्तिवान,उदार शहाजी राजे होऊन गेले.

# श्रीमन् क्षत्रियकुलावतंस शिवछत्रपति यांचे सुबक

येनाकर्णविकृष्टकार्मूकचलत्काण्डावलीकर्ति |
प्रत्यर्थिक्षितीपालमौलिनिवहैरभ्यर्चि विश्वंभरा||
यस्यानेक वसुंधरा परिवृढ प्रोत्तुंग चूडामणे: |
पुत्रत्त्वं समुपागत: शिव इति ख्यात पुराणो विभु: ||

**अर्थ:** ज्यांनी वैर करणाऱ्या महिपालांची (अनेक राजांची)गर्वोन्मत मस्तके (मुंडमाला) विश्वंभरास अर्पण केली,अशा वसुंधरेस गवसणी घालणाऱ्यांमध्ये,उत्तुंग व श्रेष्ठ असणाऱ्या,पुत्र 'शिव'म्हणून पुराणांतरींचा

प्रभु(अंशावतार?)जन्मास आला.त्या शहाजीराजांना,महाशूर मुलखाचे धनी असलेले,लोकांना पर्वतासारखे(हिमालय)उत्तुंग म्होरके वाटणारे,पुराणातील पुरूषश्रेष्ठ,शिवासारखे राजे शिवाजी हे श्रेष्ठ पुत्र झाले.

## श्रीशंभूराजे उर्फ संभाजीराजे यांचे सुबक

तस्यात्मज:शंभुरिति प्रसिध्द:समस्तसामन्त शिरोवतंस:|
य:काव्यसाहित्य पुराणगीतकोदण्डविद्यार्णव पारगामी ||

अर्थ: अशा त्या थोर शिवप्रभूंच्या समस्त मांडलिकामध्ये शिरोभूषण म्हणून शोभणारा आत्मज (आत्मन् चा अंश) शंभू(राजा)म्हणून प्रसिध्दीस आला.तो काव्य, साहित्य, संगीत,धनुर्विद्या इ.चा कलासागर पार केलेला होता.(पारंगतच झालेला होता.)

# नृपशंभू...

जव निधर्म होता कौर्य
गाजवी धर्म, जागवी शौर्य
तख्त झुकवितो, सख्त मराठा
मर्द सिवाका छावा. . .!!

शंभू समशेरीचे पुण्य
जाहली स्वराज्य दौलत धन्य
बेशक, रणमर्द मराठा
मर्द सिवाका छावा. . .!!

काळ समोरी उभा
तरीही ललकारीतो नभा
धर्मवीर हा धर्म मराठा
मर्द सिवाका छावा. . .!!

पितृधर्मी अखंड यज्ञ
जरी आग, तरीही सुज्ञ
पुत्र असा जन्मावा जैसा
मर्द सिवाका छावा. . .!!

'बुधभुषणम' काव्य हा
'सात सतकी' दिव्य
'नखशिखां' त संस्कृत मराठा
मर्द सिवाका छावा. . .!!

-सचिन काकडे -मुंबई

तरंग उठतो नाम गुंजता
उरात फ़ुटतो खोल हुंदका
बिनशर्त बेदर्द मराठा
मर्द सिवाका छावा...!!

तुफ़ान गर्जतो, आग ओकतो
वाघ मराठी जान झोकतो
बुलंद सह्याद्री उभा पहाडी राजा
वो मर्द सिवाका छावा...!!

ही तोफ़ मराठी, पोत भवानी
अभिमान शिवाचा, शान जिजाई
साक्षात चंडीका त्या जगदंबेचा
टिळा
मर्द सिवाका छावा...!!

बिनशर्थ मराठी शान
उभ्या सह्याद्रिचा छावा...!!
खुब लढा बेदर्द मराठा
मर्द सिवाका छावा...!!

पोत शिवाजी तलवार
भवानी गनिमा ललकारी
उंच पताका हिंद सुभा
दख्खनचा भगवा छावा...!!

-सुधीर मुळीक- मुंबई

# संदर्भ:


कृष्णाजी अनंत सभासद-विरचित शिवछत्रपतींचे चरित्र(सभासद बखर)

र.वि.हेरवाडकर

श्री शिव छत्रपतींची ९१ कलमी बखर -वि.स.वाकसकर

संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे -र.वि.हेरवाडकर

थोरले शाहू महाराज यांचे चरित्र -र.वि.हेरवाडकर

ताराबाईकालीन कागदपत्रे -आप्पासाहेब पवार

परमानंदकाव्यम -गो.स.सरदेसाई

मराठ्यांची इतिहासाची साधने- वि.का.राजवाडे

मराठ्यांचे स्वातंत्र्ययुध्द(खाफीखानाचा साधनग्रंथ) -सेतूमाधव पगडी

बुधभूषण(छत्रपती संभाजीराजे शिवाजीराजे भोसले)  -प्रभाकर ताकवले

शंभूराजेकृत नायिकाभेद,नखशिख,सातसतक -प्रभाकर ताकवले

राधामाधवविलासचंपू(जयराम पिंड्येकृत) -वि.का.राजवाडे

शिवकालीन-पत्रसार-संग्रह,खंड १ व २ - न.चि.केळकर,द.वि.आपटे

शिवछत्रपतींची पत्रे -डॉ अनुराधा कुलकर्णी

मराठा रियासत- गोविंद सरदेसाई.

मराठेशाहीचा मागोवा- डॉ.जयसिंगराव पवार.

छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ- डॉ.जयसिंगराव पवार.

श्री.शिवछत्रपती-संकलित शिवचरित्राची प्रस्तावना,आराखडा

व साधने -त्रं. शं शेजवलकर.

राजा शिवछत्रपति- बाबासाहेब पुरंदरे

गडसंच -बाबासाहेब पुरंदरे


esahity@gmail.com

आज्ञापत्रे- विलास खोले.
साक्ष इतिहासाची -निनाद बेडेकर.
औरंगजेबाच्या दरबाराचे अखबार(ऐतिहासिक फारसी साहित्य खंड ६) - ग.ह.खरे,गो.त्र्यं.कुलकर्णी
बावडा दप्तर(खंड १ व २) - के.गो.सबनीस
मराठे व औरंगजेब(साकी मुस्तैदखानकृत मासिरे आलमगिरीचा मराठी अनुवाद) -सेतुमाधव पगडी
शिवराय:संस्कार आणि शिक्षण- आ.ह.साळुंखे .
Shivaji and his times -Jadunath Sarkar.
Shivaji, the great Maratha -H. S. Sardesai.

## लेखन – श्री. दामोदर मगदूम



न्यू पॉलिटेक्निक, कोल्हापूर मधून इलेक्ट्रॉनिक्सचा पदविका अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर डी.वाय.पाटील इंजि.कॉलेज,कोल्हापूर मधून इलेक्ट्रॉनिक्स पदवी प्राप्त केली.नंतर भारतीय अवकाश संशोंधन संस्था(इस्त्रो),अहमदाबाद येथे उपग्रह दळणवळणातील संशोधनासाठी इंटरनॅशनल युनियन ऑफ रेडिओ सायन्स (URSI),बेल्जियम चा यंग सांयटिस्ट पुरस्कार मिळाला.त्याचप्रमाणे इंडियन सायन्स कॉंग्रेसचाही पुरस्कार मिळाला.मा.राष्ट्रपती अब्दूल कलाम यांच्याकडून राष्ट्रपती भवनात विशेष सन्मान प्राप्त झाला.त्याचबरोबरइतर अनेक सन्मान प्राप्त झाले.

esahity@gmail.com

सामाजिक कार्याच्या जाणिवेतून मराठी देशा व हरित भूमि फौंडेशन या दोन संस्था स्थापन केल्या.नुकताच मराठी भाषादिनी यांच्या मराठी देशा या संकेतस्थळाला महाराष्ट्र शासनाचा सर्वोच्च मराठी संकेतस्थळाचा प्रथम पुरस्कार प्राप्त झाला आहे.

सध्या  माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात अग्रगण्य असणाऱ्या संस्थेमध्ये संशोधन विभागात कार्यरत आहे.

अधिक माहितीसाठी खालील ईमेल व संपर्क करावा


## श्री. दामोदर मगदूम

www.marathidesha.com

marathidesha@gmail.com

Cell:9421051889

# संभाजीराजे महान राष्ट्रवीर



संभाजीराजेंनी स्वराज्यासाठी,स्वराष्ट्रासाठी बलिदान केले.संभाजीराजा महान राष्ट्रवीर होते.अशा या राष्ट्रवीराचे महान कार्य पेशवेकालीन बखरींनी आणि आजच्या युगातील काही इतिहासकारांनी चुकीचे रंगविले आहे.याउपर संभाजीराजेंनी धर्मासाठी प्राण सोडिला, संभाजीराजें धर्मवीर होते असा चुकीचा इतिहास लिहिला गेला.चुकीचा इतिहास खरा मानून आपण या महान राष्ट्रवीराचे महत्त्व आपण कमी करत आहोत.याठिकाणी एक गोष्ट लक्षात घेण्याची सर्वांना गरज आहे.छत्रपती शिवराय व छत्रपती संभाजी हे हिंदू राजे होते पण त्यांचा लढा इस्लामी जनतेशी नसून जुलमी इस्लामी राजसत्तेशी होता.सर्व धर्मियात पुज्यनिय असलेल्या छत्रपती शिवराय व छत्रपती संभाजी या महान राष्ट्रपुरूषांना आज आपण एकाच धर्माच्या बंधनात अडकविले आहे.हे करून आपण त्यांच्या विचारांशी प्रतारणा करत आहेत हे सर्वांनी लक्षात ठेवले पाहिजे.

# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरूदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेलं ई-श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्ल्यांची माहिती देणा-या पुस्तिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली. लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाखभर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही. आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२ लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

:अधिक माहितीसाठी :

संकेत स्थळ

www.esahity.com

फेसबुक

https://www.facebook.com/esahity

esahity@gmail.com

